2011011415190५001

पिंपरी-चिंचवड महानगरपालिका
महानगरापालिकेच्या आस्थापनेवरील'मुख्य वाहनचालक' या पदाची वेतनश्रेणी सुधारीत करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

शासन निर्णय क्र. पीसासी ३००५/२००९/प्र.क्र.२७८/०६/नवि-२२
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ दिनांक :- ३१ ऑगस्ट, २००९

वाचा :- (१) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. लेखा/३/कावि/१५३/०५, दिनांक २८/३/२००५ व त्यासोबतचा वेतन त्रुटी समितीचा अहवाल व महानगरपालिका ठराव क्र.५०६१, दिनांक ४/१२/२००३

(२) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र.लेखा/३/कावि/४२६/०५, दिनांक २१/१२/२००५

(३) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र.लेखा/३/ कावि/८०/ २००६ ,दिनांक २५/५/२००६

(४) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र.लेखा/३/ कावि /१९६ / २००६ , दिनांक २९/८/२००६

(५) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. लेखा/३/कावि/४९२/ २००६, दिनांक ११/१२/२००६

(६) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. लेखा/३/कावि/१९६/ २००७, दिनांक १३/०४/२००७

(७) या विभागाचा समक्रमांक दि. ५ मार्च, २००७ चा शासन निर्णय.

(८) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. लेखा/३/कावि/४९८/ २००८, दिनांक १६/०५/२००८.

**प्रस्तावना :--**

पिंपरी-चिंचवड महानगरपालिका कर्मचारी महासंघाने व काही कर्मचा-यांनी सातत्याने त्यांना लागू केलेल्या वेतनश्रेणीत त्रुटी असल्याने वा त्रुटी दूर करणेबाबत मागणी केली होती. त्यासंदर्भात पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेने महापालिकेतील वरिष्ठ अधिका-यांची व कर्मचारी महासंघाचे २ प्रतिनिधी यांची वेतनत्रुटी समिती गठित केली होती. या समितीने दिनांक ३/६/२००३ रोजी महानगरपालिकेस अहवाल सादर केला असून या अहवालानुसार ज्या पदांची वेतनश्रेणी सुधारित करणे आवश्यक आहे, त्याबाबतचा प्रस्ताव स्थायी समितीमार्फत महापालिका सभेपुढे सादर करण्यात आला होता. पिंपरी-चिंचवड महानगरपालिका महासभेने ठराव क्रमांक ५०६१, दिनांक ४/१२/२००३ अन्वये त्यास मान्यता दिलेली आहे. त्या अनुषंगाने आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी मनपाच्या आस्थापनेवरील मुख्य वाहनचालक पदाच्या

वेतनश्रेणीत सुधारणा करण्याचा प्रस्ताव समर्थनासह व आस्थापना खर्चाच्या माहितीसह संदर्भाधीन पत्रान्वये शासनास मान्यतेसाठी सादर केला होता. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :--**

आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी वेतनत्रुटी समिती अहवाल आणि महासभा ठराव क्रमांक ५०६१, दिनांक ४/१२/२००३ च्या अनुषंगाने प्रस्तावित केल्यानुसार, पिंपरी चिंचवड महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील **"मुख्य वाहनचालक"** या संवर्गातील पदाची वेतनश्रेणी **रु.४५००-७००० ऐवजी रु. ५०००-८०००** अशी सुधारित करण्यास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम-५१(४) अन्वये प्राप्त अधिकारात शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर वेतनश्रेणी सुधारणेबाबत सर्व सांविधानिक व विनियम विषयक बाबींची पूर्तता आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे यांनी करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नांवाने,

(सुनील कोठेकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,
१. मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
२. सचिव (नवि-२), नगर विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई - ३२
३. आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे,
४. निवडनस्ती (नवि-२२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२